**अकोला महानगरपालिकेच्या दिनांक ०२/०७/२०२० रोजीच्या सर्वसाधारण सभेने पारित केलेले ठराव क्र.०६ ते २२ व दिनांक ०२/०९/२०२० रोजीच्या स्थायी समितीच्या सभेत पारित केलेले ठराव क्र.०५ ते ०७ हे महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम कलम ४५१ (३) अन्वये अंतिमत: विखंडीत करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नगरविकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक-अकोला-२०२०/प्र.क्र.४४/नवि-२६**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १४ डिसेंबर,२०२१

**<u>संदर्भ</u> :-** १) विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती यांचे पत्र क्र.प्रशासकीय सेवा/ कावि-२०१७/२०२० दिनांक ०१/११/२०२०

२) शासन निर्णय, समक्रमांक दिनांक २४/१२/२०२०

३) महापौर, अकोला महानगरपालिका यांचे पत्र क्र. निरंक दिनांक २२/०१/२०२१ नुसार प्राप्त अभिवेदन

४)सभापती, स्थायी समिती, अकोला यांचे पत्र क्र. निरंक दिनांक २२/०१/२०२१ नुसार प्राप्त अभिवेदन

५) आयुक्त, अकोला महानगरपालिका यांचे वतीने नगरसचिव, अकोला महानगरपालिका यांचे पत्र क्रमांक निरंक दिनांक २२/०१/२०२१ नुसार प्राप्त अभिवेदन

**<u>प्रस्तावना :-</u>**

अकोला महानगरपालिकेच्या दिनांक ०२/०७/२०२० सर्वसाधारण सभेने पारित केलेले ठराव क्र.०६ ते २२ व दिनांक ०२/०९/२०२० च्या स्थायी समितीच्या सभेत पारित केलेले ठराव क्र.०५ ते ०७ हे यापूर्वी संदर्भाधीन क्र.०१ येथील चौकशी अहवालाच्या आधारे संदर्भाधीन क्र.०२ येथील शासन निर्णयान्वये, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ४५१ (१) नुसार तात्पुरते निलंबित करण्यात आले होते. या शासन निर्णयानुसार, अभिवेदनाची संधी देण्यात आलेली होती. त्यानुसार संदर्भाधीन क्र. ०३, ०४ व ०५ येथील पत्रान्वये अनुक्रमे महापौर व स्थायी समिती अध्यक्ष आणि आयुक्त, अकोला महानगरपालिका यांचे अभिवेदन शासनास प्राप्त झाले होते. या अभिवेदनाचे अवलोकन केले असता, सदरची अभिवेदने स्विकारार्ह नसल्याने, अकोला महानगरपालिकेच्या दिनांक ०२/०७/२०२० सर्वसाधारण सभेने पारित केलेले ठराव क्र.०६ ते २२ असे एकूण १७ ठराव व दिनांक ०२/०९/२०२० च्या स्थायी समितीच्या सभेत पारित केलेले ठराव क्र.०५ ते ०७ असे एकूण ३ ठराव, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ४५१ (३) नुसार अंतिमत: विखंडीत करण्याची बाब तसेच सदरचे ठराव हे महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील तरतुदीचे उल्लंघन करुन पारित केलेले असल्याने व यामुळे महापालिकेच्या आर्थिक हितास बाधा पोहचल्याचे प्रथमदर्शनी दिसून येत असल्याने, सदरचे ठराव पारित

करणाऱ्या संबंधित महापौर, स्थायी समिती सभापती व नगरसचिव तसेच तत्कालिन आयुक्त, अकोला महानगरपालिका यांचे विरोधात आर्थिक अनियमिततेमुळे कारवाई करणे आवश्यक असल्याचे दिसून आल्याने, त्यांच्या विरोधात FIR (गुन्हे) दाखल करण्यासंदर्भात, आयुक्त, अकोला महानगरपालिका यांना निदेश देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. तद्नुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

**(१)** अकोला महानगरपालिकेच्या दिनांक ०२/०७/२०२० च्या सर्वसाधारण सभेने पारित केलेले ठराव क्र.०६ ते २२ व दिनांक ०२/०९/२०२० च्या स्थायी समितीच्या सभेत पारित केलेले ठराव क्र.०५ ते ०७ हे महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील तरतुदीच्या विरोधात पारित झालेले असल्याने, सदरचे सर्व ठराव महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाचे कलम ४५१ (३) नुसार अंतिमत: विखंडीत करण्यात येत आहेत.

**(२)** सदरचे सर्वच ठराव हे अधिनियमातील तरतुदींचे उल्लंघन करुन पारित केलेले असल्याने व यामुळे महापालिकेच्या आर्थिक हितास बाधा पोहोचत असल्याचे प्रथमदर्शनी दिसून येत असल्याने, सदरचे ठराव नियमबाह्यपणे पारित करणारे संबंधित महापौर, संबधित स्थायी समिती सभापती, संबंधित नगरसचिव व तत्कालिन आयुक्त, अकोला महानगरपालिका यांचेविरोधात आर्थिक अनियमिततेमुळे तात्काळ FIR (गुन्हे) दाखल करण्याची कारवाई आयुक्त, अकोला महानगरपालिका यांनी करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२१४१८५६३८९१२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Digitally signed by Vidya Ramappa Hampayya
Date: 2021.12.15 13:08:52 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.महापौर/सभापती, अकोला महानगरपालिका, अकोला, द्वारा आयुक्त, अकोला महानगरपालिका,
२) आयुक्त, अकोला महानगरपालिका, अकोला
३) प्रधान सचिव (नवि-२) यांचे वि.का.अ.
४) मा.मंत्री (नगरविकास)/मा.राज्यमंत्री (नगरविकास) यांचे खाजगी सचिव यांना माहितीस्तव अग्रेषित.
५) उप सचिव (नवि-२६), नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) निवडनस्ती, कार्यासन नवि-२६.